घोटी पाणी पुरवठा योजना, ता.अकोले जि. अहमदनगर योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु २०१२/ सं.क्र.३८७ / पा.पु.०९

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०७ मे, २०१५

वाचा

१) शासन पत्र क्रमांकः बैठक२०१२/ प्र.क्र.१२२/ पा.पु.०६ दि. ३१ ऑगस्ट २०१२
२) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना मंडळ, अहमदनगर यांचे पत्र क्रमांकः तांशा/घोटी/१४६४/२०१२ दि.२१/५/२०१२

**प्रस्तावना:-**

घोटी पाणी पुरवठा योजना, ता. अकोले जि. अहमदनगर या पाणी पुरवठा योजनेच्या रु. ४१.१२ लक्ष ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास ग्रामपंचायत, घोटी यांनी दि.८/१२/२००६ च्या ठरावा अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केली होती. तथापि, काही अपरिहार्य कारणांमुळे योजनेच्या खर्चात रु.३९.७९ लाखाने वाढ झाली आहे. सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या राज्य स्तरावरील छोटया गटाच्या दि. २९.६.२०१२ रोजीच्या बैठकीत शिफारस केल्यानुसार घोटी पाणी पुरवठा योजना, ता. अकोले जि. अहमदनगर या पाणी पुरवठा योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

वरील बाब विचारात घेऊन घोटी पाणी पुरवठा योजनेच्या रु.३९.७९ लक्ष (रुपये एकोणचाळीस लक्ष एकोंणऐंशी हजार फक्त) या वाढीव खर्चासह रु. ८०.९१ लक्ष (रुपये ऐशीं लक्ष एक्यान्नव हजार फक्त) इतक्या सुधारित किमतीस प्रशासकीय मान्यता देणेबाबत नियोजन व वित्त विभागास प्रस्ताविण्यात आले होते. तथापि वित्त विभागाने, योजनेच्या मूळ अंदाजपत्रकामध्ये १७.५% ईटीपी चार्जेस समाविष्ट करून योजना रु. ४१.१२ लक्षची झालेली आहे. मूळ योजनेत भाववाढीची तरतूद नसताना सुधारित योजनेत भाववाढीसाठी रु. ५.०२ लक्ष दर्शविले आहेत व वाढीव खर्चावर पुन्हा ९% ईटीपी चार्जेस रु. २.८८ लक्ष समाविष्ट केलेला आहे.त्यामुळे सदर रक्कमा कमी करून येणारी किंमत रु. ७३.०१ लक्षला मंजुरी प्रदान केलेली आहे. त्यानुसार घोटी पाणी पुरवठा योजनेच्या रु. ७३.०१/- (रु. त्र्याहत्तर लक्ष एक हजार फक्त) इतक्या सुधारित किंमतीस पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

२) या योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या निर्णयातील सूचना व तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच मूळ शासन निर्णयात ज्या अटी व शर्ती दिल्या आहेत त्या कायम राहणार असून त्याचेही पालन करण्यांत यावे.

३) सदर योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधीत ग्रामपंचायत/ जिल्हा परिषदेच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधीत कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना विभाग यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यासंबंधी संबंधीत ग्रामपंचायत / जिल्हापरिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हापरिषद व संबधित ग्रामपंचायतीच्या अधिका-यांनी संयुक्तपणे पहाणी आयोजित करावी आणि अशा पहाणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४) सदर योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) यावर दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा घसारा किंवा यंत्रसामुग्री नवी करण्याच्या निधीसाठी किंवा योजनांच्या खर्चातील लाभ घेण्याचा हिस्सा सोसण्यासाठी येईल त्या खर्चाच्या व्यवस्थेसाठी जिल्हा परिषदेस किंवा ग्रामपंचायतीस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम, १९६० मधील तरतुदींनुसार आकारण्यात येणा-या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल हे पाहण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची / जिल्हा परिषदेची राहील.

५) सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार २१ पाणी पुरवठा योजना देखभाल व दुरुस्ती अभावी विज देयके न भरल्यामुळे (poor maintenance/non payment of electricity bills)बंद पडलेल्या असल्याचे दिसून येते. त्यामुळे सदर योजना आर्थिकदृष्टया सक्षम राहण्यासाठी पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ करण्यात यावी.त्या अनुषंगाने या योजनेकरीता पाणीपट्टी ग्रामपंचायत आकारेल. ग्रामपंचायतीने तशा आशयाचा ठराव केल्याशिवाय योजनेची उर्वरित कामे हाती घेवू नयेत.

६) योजनेची चाचणी घेतल्यानंतर योजना संबंधित ग्रामपंचायतीकडे हस्तांतरीत करून तिचे लेखे बंद करण्यात यावे.

७) सदर योजनेची उर्वरीत कामे सहा महिन्याच्या कालावधीत पूर्ण करण्यात यावीत.

८) यानंतर योजना पुर्नसुधारित करण्यात येणार नाही याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची राहिल.

९) या योजनेवर होणारा खर्च आदिवासी उपयोजनेअंतर्गत उपलब्ध करण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र. ३४८/१४४३ दि. ६/१/२०१४ व १२४/व्यय-३ दि.१०/४/२०१५ अन्वये प्राप्त त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५०७१२५२५३१८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Deoram Ambekar

Digitally signed by Suresh Deoram Ambekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Deoram Ambekar
Date: 2015.05.07 15:36:43 +05'30'

**(सु. दे. आंबेकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) सर्व मा. विधानसभा/ विधानपरिषद सदस्य
३) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
६) जिल्हाधिकारी, अहमदनगर.
७) संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट, पुणे.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर.
९) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
१०) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर
११) मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पा.पु.व स्व.वि., यांचे स्वी.सहा. मंत्रालय, मुंबई.
१२) मुख्य अभियंता (ना व ग्रा), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ठाणे.
१३) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन बेलापूर, नवी मुंबई.
१५) अधीक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, समन्वय व सनियंत्रण कक्ष, नाशिक
१६) अधीक्षक अभियंता, म.जी.प्रा. (ना. व ग्रा.) योजना मंडळ, अहमदनगर.
१७) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, ना. व ग्रा. योजना विभाग, अहमदनगर
१८) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, अहमदनगर.

१९) जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, अहमदनगर.
२०) वित्त विभाग (व्यय-०३) व नियोजन विभाग (कार्यासन -१४४३), मंत्रालय, मुंबई.
२२) कार्यासन क्रमांक पापु-०४,०६,१०,१३,१७,१८, २० व संगणक कक्ष, पा.पु.व स्व.वि., मंत्रालय,
२३) निवड नस्ती पापु-०९